

# १ : श्रीगुरुदत्ताष्टक

## (गुरुचरित्र अध्याय ४० वा)

इंदुकोटितेजकरुणसिंधु भक्तवत्सलं।
नंदनात्रिसूनु दत्तमिंदिराक्ष श्रीगुरुम्॥
गंधमाल्यअक्षतादिवृंददेववंदितं।
वंदयामि नारसिंहसरस्वतीश पाहि माम्॥१॥

मायपाशअंधकारछायदूरभास्करं।
आयताक्ष पाहि श्रियावल्लभेशनायकम्॥
सेव्यभक्तवृंदवरद भूयभूय नमाम्यहम्।
वंदयामि नारसिंहसरस्वतीश पाहि माम्॥२॥

चित्तजादिवर्गषट्क-मत्तवारणांकुशम्।
तत्त्वसारशोभितात्मदत्त श्रियावल्लभम्॥
उत्तमावतार भूत-कर्तृ भक्तवत्सलं।
वंदयामि नारसिंहसरस्वतीश पाहि माम्॥३॥

व्योमरापवायुतेजभूमिकर्तुमीश्वरम्।
कामक्रोधमोहरहित सोमसूर्यलोचनम्॥

कामितार्थदातृ भक्तकामधेनु श्रीगुरुम्।
वंदयामि नारसिंहसरस्वतीश पाहि माम्।।४।।

पुंडरीकआयताक्ष कुंडलेंदुतेजसम्।
चंडदुरितखंडनार्थ दंडधारि श्रीगुरुम्।।
मंडलीकमौलिमार्तंडभासिताननं।
वंदयामि नारसिंहसरस्वतीश पाहि माम्।।५।।

वेदशास्त्रस्तुत्यपाद आदिमूर्तिश्रीगुरुम्।
नादबिंदुकलातीत, कल्पपादसेव्ययम्।।
सेव्यभक्तवृंदवरद भूयभूय नमाम्यहम्।
वंदयामि नारसिंहसरस्वतीश पाहि माम्।।६।।

अष्टयोगतत्त्वनिष्ठ तुष्ट ज्ञानवारिधिम्।
कृष्णवेणितीरवासपंचनदीसंगमम्।।
कष्टदैन्यदूरिभक्ततुष्टकाम्यदायकम्।
वंदयामि नारसिंहसरस्वतीश पाहि माम्।।७।।

नारसिंहसरस्वती नामअष्टमौक्तिकम्।
हारकृत शारदेन गंगाधर आत्मजं।।
धारणीक देवदीक्षगुरुमूर्तितोषितम्।
परमात्मानंदश्रियापुत्रपौत्रदायकम्।।८।।

नारसिंहसरस्वतीय अष्टंक च यः पठेत्।
घोरसंसारसिंधुतारणाख्यसाधनम्।।
सारज्ञानदीर्घआयुरारोग्यादिसंपदम्।
चारुवर्गकाम्यलाभ वारंवार यः जपेत्।।९।।

# २ : श्रीदत्तस्तवस्तोत्रम्

भूतप्रेतपिशाचाद्या यस्य स्मरणमात्रतः।
दूरादेव पलायन्ते दत्तात्रेयं नमामि तम्॥१॥

यन्नामस्मरणाद्दैन्यं पापं तापश्च नश्यति।
भीतिग्रहार्तिदुःस्वप्नं दत्तात्रेयं नमामि तम्॥२॥

दद्रुस्फोटककुष्ठादि महामारी विषूचिका।
नश्यंत्यन्येऽपि रोगाश्च दत्तात्रेयं नमामि तम्॥३॥

सगजा देशकालोत्था अपि सांक्रमिका गदाः।
शाम्यन्ति यत्स्मरणतो दत्तात्रेयं नमामि तम्॥४॥

सर्पवृश्चिकदष्टानां विषार्तानां शरीरिणाम्।
यन्नाम शांतिदं शीघ्रं दत्तात्रेयं नमामि तम्॥५॥

त्रिविधोत्पातशमनं विविधारिष्टनाशनम्।
यन्नाम क्रूरभीतिघ्नं दत्तात्रेयं नमामि तम्॥६॥

वैर्यादिकृतमंत्रादिप्रयोगा यस्य कीर्तनात्।
नश्यंति देवबाधाश्च दत्तात्रेय नमामि तम्॥७॥

यच्छिष्यस्मरणात्सद्यो गतनष्टादि लभ्यते।
य ईशः सर्वतस्त्राता दत्तात्रेयं नमामि तम्॥८॥

जयलाभयशः कामदातुर्दत्तस्य यः स्तवम्।
भोगमोक्षप्रदस्येमं पठेद्दत्तधियो भवेत्॥९॥

इति श्री. प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचितं
दत्तस्तवस्तोत्रं संपूर्णम्॥

## ३ : श्रीगुरुदेवदत्तस्तोत्र

(श्रीमत् सदगुरु समर्थ श्रीपद्मनाभाचार्यस्वामीमहाराजकृत)

(हे स्तोत्र श्रीपद्मनाभस्वामीसंप्रदायांतील नित्यपाठांतील आहे.)

सदा प्रार्थितों स्वामि तूझ्या पदासी
नमोनी तुला वर्णितों आदरेंसीं;
धरोनी करीं तारिं या बाळकासी
नमस्कार माझा श्रीदत्तात्रयासी ॥१॥

मतीहीन मी दीन आहें खरा हो
परि बाळ तूझा मिं माया करा हो
जसें पोटिचें लेंकरुं माय पोसी
नमस्कार माझा श्रीदत्तात्रयासी ॥२॥

लडीवाळ मी बाळ अज्ञान तूझें
तुझ्या कृपेनें दुःख जळेल माझें
अन्य उपाय नाहीं कीं निश्चयेंसी
नमस्कार माझा श्रीदत्तात्रयासी ॥३॥

गणगोत बंधू पिता तूंची देवा
इष्ट मित्र कांहीं नसे अन्य हेवा
तुजवीण त्राता नसे या जिवासी
नमस्कार माझा श्रीदत्तात्रयासी ॥४॥

गुरूची लीला जो करी नित्यपाठ
स्तुती भक्तिभावें करी एकनिष्ठ
तया पुत्रप्राप्ती महाज्ञानराशी
नमस्कार माझा श्रीदत्तत्रयासी ॥५॥

जो औदुंबरी वाडिमार्जी त्रिकाळ
बसूनी त्रिलोकीं क्रमी सर्व काळ
तया गुरुनाथा वर्णवेना मुखेंसीं
नमस्कार माझा श्रीदत्तात्रयासी ।।६।।
निजभक्तांसी दे जो राज्यासनाला
स्मरतांच पळवी रोगादिकांला,
उपवेद श्वानें नमिती पदासी
नमस्कार माझा श्रीदत्तात्रयासी ।।७।।
माता अनुसूया पिता अत्रिनाथ
अतितीव्र गुरु हा स्वामी समर्थ;
पापताप दुःखें स्मरणेंची नासी
नमस्कार माझा श्रीदत्तात्रयासी ।।८।।
म्हणे पद्मनाभ स्मरा नेम साचा
धरोनी मनीं निश्चय अष्टकांचा;
धनधान्य वृद्धी सुखसंपदेसी
पावाल नमितां गुरुपादुकांसी ।।९।।

## ४ : घोरकष्टोद्धरणस्तोत्रम्

श्रीपादश्रीवल्लभ त्वं सदैव, श्रीदत्तास्मान्पाहि देवाधिदैव।
भावग्राह्य क्लेशहारिन्सुकीर्ते, घोरात्कष्टदुद्धरास्मान्नमस्ते ।।१।।

त्वं नो माता त्वं पिताऽऽप्तोऽधिपस्त्वं, त्राता योगक्षेमकृत्सद्गुरुस्त्वम्।
त्वं सर्वस्वं नो प्रभो विश्वमूर्ते घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।।२।।

पापं तापं व्याधिमाधिं च दैन्यं, भीतिं क्लेशं त्वं हराऽशु, त्वदन्यम्।
त्रातारं नो वीक्ष ईशास्तजूर्ते, घोरात्कष्टदुद्धरास्मान्नमस्ते ।।३।।

नान्यस्त्राता नापि दाता न भर्ता, त्वत्तो देव त्वं शरण्योऽकहर्ता।
कुर्वात्रेयानुग्रंह पूर्णराते, घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ।।४।।

धर्मे प्रीतिं सन्मति देवभक्तिं, सत्संगाप्तिं देहि मुक्तिं च भुक्तिम्।
भावासक्तिं चाखिलानन्दमूर्ते, घोरात्कष्टदुद्धरास्मान्नमस्ते ।।५।।

श्लोकपंचकमेतद्यो लोकमंगलवर्धनम्।
प्रपठेन्नियतो भक्त्या व श्रीदत्तप्रियो भवेत् ।।६।।

।। इति श्रीमद्वासुदेवानंदसरस्वतीकृतं घोरकष्टोद्धरणस्तोत्रं संपूर्णम् ।।

## ५ : श्रीदत्तात्रेयस्तोत्रम्

श्री गणेशाय नमः ।। श्रीगुरवे नमः ।।
जटाधरं पांडुरंगं शूलहस्तं कृपानिधिम् ।।
सर्वरोगहरं देवं दत्तात्रेयमहं भजे ।।१।।

अस्य श्रीदत्तात्रेयस्तोत्रमंत्रस्य ।। भगवान्नारद ऋषिः ।।
अनुष्टुप छंदः ।। श्रीदत्तः परमात्मा देवता ।।
श्री दत्तप्रीत्यर्थे जपे विनियोगः ।।
जगदुत्पत्तिकर्त्रे च स्थितिसंहार हेतवे ।।
भवपाशाविमुक्ताय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।२।।

जराजन्मविनाशाय देहशुद्धिकराय च ।।
दिगंबर दयामूर्ते दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।३।।

कर्पूरकांतिदेहाय ब्रह्ममूर्तिधराय च ।।
वेदशास्त्रपरिज्ञाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।४।।

ह्रस्वदीर्घकृशस्थूल-नामगोत्र-विवर्जित ॥
पंचभूतैकदीप्ताय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥५॥

यज्ञभोक्त्रे च यज्ञाय यज्ञरुपधराय च ॥
यज्ञप्रियाय सिद्धाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥६॥

आदौ ब्रह्मा मध्ये विष्णुरन्ते देवः सदाशिवः ॥
मूर्तित्रयस्वरुपाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥७॥

भोगालयाय भोगाय योगयोग्याय धारिणे ॥
जितेंद्रिय जितज्ञाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥८॥

दिगंबराय दिव्याय दिव्यरूपधराय च ॥
सदोदित परब्रह्म दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥९॥

जंबुद्वीपे महाक्षेत्रे मातापुरनिवासिने ॥
जयमान, सतां देव, दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥१०॥

भिक्षाटनं गृहे ग्रामे पात्रं हेममयं करे ॥
नानास्वादमयी भिक्षा दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥११॥

ब्रह्मज्ञानमयी मुद्रा वस्त्रमाकाशभूतले ॥
प्रज्ञानघनबोधाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥१२॥

अवधूत सदानंद परब्रह्मस्वरूपिणे ॥
विदेहदेहरूपाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥१३॥

सत्यरूप सदाचार सत्यधर्मपरायण ॥
सत्याश्रय परोक्षाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ॥१४॥

शूलहस्त गदापाणि वनमालासुकंधर ।।
यज्ञसूत्रधर ब्रह्मन् दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।१५।।

क्षराक्षरस्वरूपाय परात्परतराय च ।।
दत्तमूर्तिपरस्तोत्र दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।१६।।

दत्तविद्याढ्य लक्ष्मीश दत्तस्वात्मस्वरूपिणे ।।
गुणनिर्गुणरूपाय दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।१७।।

शुत्रनाशकरं स्तोत्रं ज्ञान-विज्ञानदायकम् ।।
सर्वपापं शमं याति दत्तात्रेय नमोऽस्तु ते ।।१८।।

इदं स्तोत्रं महद्दिव्यं दत्तप्रत्यक्षकारकम् ।।
दत्तात्रेयप्रसादाच्च नारदेन प्रकीर्तितम् ।।१९।।

।। इति श्रीनारदपुराणे श्रीनारदविरचितं दत्तात्रेयस्तोत्रं संपूर्णम् ।।

## ६ : दत्तस्तोत्रम्

आदौ ब्रह्म त्वमेव सर्व जगतां, वेदातत्ममूर्तिं विभुं।
पश्चात् क्षोणिजडा विनाशदितिजां, कृत्वाऽवतारं प्रभो ।।
हत्वा दैत्यमनेकधर्मचरितं, भूत्वाऽत्मजोऽत्रेर्गृहे।
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम् ।।१।।

भूदेवाखिलमानुषं विदुजना, बाधायमानं कलिम्।
वेदादुष्ममनेकवर्णमनुजा भेदादि भूतोन्नतम् ।।
छेदःकर्मतमांधकारहरणं श्रीपाद-सूर्योदये।
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम् ।।२।।

धातस्वं हरि शंकर प्रति गुरो, जाताग्रजन्मं विभो।
हेतुः सर्वविदोजनाय तरणं ज्योतिःस्वरुपं जगत्॥
चातुर्थाश्रमस्थापितं क्षितितले, पातुः सदा सेव्ययम्।
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम्॥३॥

चरितं चित्रमनेकीर्तिमतुलं परिभूतभूमंडले।
मूकं वाक्य दिवांधकस्य नयनं वंध्यां च पुत्रं ददौ॥
सौभाग्यं विधवा च दायक श्रियं, दत्वा च भक्तं जनम्।
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम्॥४॥

दुरितं घोरदरिद्रदावतिमिरं, हरणं जगज्ज्योतिषम्।
स्वर्धेनुं सुरपादपूजितजना, करूणाब्धि भक्तार्तितः॥
नरसिंहेंद्र-सरस्वतीश्वर विभो, शरणागंत रक्षकम्
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम्॥५॥

गुरुमूर्तिश्चरणारविंदयुगलं, स्मरणं कृतं नित्यसौ।
चरितं क्षेत्रमनेकतीर्थसफलं, सरितादि भागीरथी॥
तुरगामेघसहस्त्रगोविदु नाः सम्यक् ददन् तत्फलम्।
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम्॥६॥

नो शक्यं तव नाममंगल स्तुवं, वेदागमागोचरम्।
पादद्वं हृदयाब्जमंतरदलं, निर्धार मीमांसतं॥
भूयोभूयः स्मरन् नमामि मनसा, श्रीमद्गुरुं पाहि माम्।
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम्॥७॥

भक्तानां तरणार्थ सर्वजगतां, दीक्षा ददन् योगिनाम्।
सुक्षेत्रं पुरगाणगस्थित प्रभो, दत्वा चतुष्कामदं॥
स्तुत्वा भक्तसरस्वती गुरुपदं, जित्वाद्यदोषदिकम्।
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम्॥८॥

एवं श्रीगुरुनाथमष्टकमिदं स्तोत्रं पठेन्नित्यसौ।
तेजोवर्चबलोन्नतं श्रियकरं आनंदवर्धं वपुः ॥
पुत्रापत्यमनेकसंपदशुभा, दीर्घायुमारोग्यतां।
वंदेऽहं नरकेसरी-सरस्वती-श्रीपादयुग्मांबुजम् ॥९॥

## ७ : श्रीदत्तगुरुशरणाष्टकम्

दत्तात्रेया तव शरणं। दत्तनाथा तव शरणं॥
त्रिगुणात्मका त्रिगुणातीता त्रिभुवनपालक तव शरणम् ॥१॥

शाश्वतमूर्ते तव शरणं। श्यामसुंदरा तव शरणं॥
शेषाभरणा शेषभूषणा शेषशायि गुरु तव शरणम् ॥२॥

षड्भुजमूर्ते तव शरणं। षड्भुजयतिवर तव शरणं।
दंडकमंडलुगदापद्मकर शंखचक्रधर तव शरणम् ॥३॥

करुणानिधे तव शरणं। करुणासागर तव शरणं।
श्रीपादवल्लभ गुरुवर नृसिंहसरस्वती तव शरणम् ॥४॥

श्रीगुरुनाथा तव शरणं। सद्‌गुरुनाथा तव शरणं।
कृष्णासंगमतरुवरवासी भक्तवत्सला तव शरणम् ॥५॥

कृपामूर्ते तव शरणं। कृपासागरा तव शरणं।
कृपाकटाक्षा कृपावलोकन कृपानिधे प्रभु तव शरणम् ॥६॥

कालांतका तव शरणं। कालनाशका तव शरणं।
पूर्णानंदा पूर्णपरेशा पुराणपुरुषा तव शरणम् ॥७॥

जगदीशा तव शरणं। जगन्नाथा तव शरणं।
जगत्पालका जगदाधीशा जगदुद्धारा तव शरणम् ॥८॥

अखिलांतरा तव शरणं। अखिलैश्वर्या तव शरणं।
भक्तप्रिया वज्रपंजरा प्रसन्नवक्त्रा तव शरणम्॥९॥

दिगंबरा तव शरणं। दीनदयाघन तव शरणम्।
दीननाथा दीनदयाळा दीनोद्धारा तव शरणम्॥१०॥

तपोमूर्ते तव शरणं। तेजोराशी तव शरणं।
ब्रह्मानंदा ब्रह्मसनातन ब्रह्ममोहना तव शरणम्॥११॥

विश्वात्मका तव शरणं। विश्वरक्षका तव शरणं।
विश्वंभरा विश्वजीवना, विश्वपरात्पर तव शरणम्॥१२॥

विघ्नांतका तव शरणं। विघ्ननाशका तव शरणं।
प्रणवातीता प्रेमवर्धना प्रकाशमूर्ते तव शरणम्॥१३॥

निजानंदा तव शरणं। निजपददायक तव शरणं।
नित्यनिरंजन निराकारा निराधारा तव शरणम्॥१४॥

चिद्‌घनमूर्ते तव शरणं। चिदाकारा तव शरणं।
चिदात्मरूपा चिदानंदा चित्सुखकंदा तव शरणम्॥१५॥

अनादिमूर्ते तव शरणं। अखिलावतारा तव शरणं।
अनंतकोटिब्रह्मांडनायका अघटितघटना तव शरणम्॥१६॥

भक्तोद्धारा तव शरणं। भक्तरक्षका तव शरणं।
भक्तानुग्रह, गुरुभक्तप्रिय, पतितोद्धारा तव शरणम्॥१७॥

## ८ : श्रीदत्तस्तोत्रम्

दत्तात्रेयं महात्मानं वरदं भक्तवत्सलम्।
प्रपन्नार्तिहरं वंदे स्मर्तृगामी स नोऽवतु॥१॥

दीनबंधुं कृपासिंधुं सर्वकारणकारणम्।
सर्वरक्षाकरं वंदे स्मर्तृगामी स नोऽवतु॥२॥

शरणागतदीनार्तपरित्राणपरायणम्।
नारायणं विभुं वंदे स्मर्तृगामी स नोऽवतु॥३॥

सर्वानर्थहरं देव सर्वमंगलमंगलम्।
सर्वक्लेशहरं वंदे स्मर्तृगामी स नोऽवतु॥४॥

ब्रह्मण्यं धर्मतत्त्वज्ञं भक्तकीर्तिविवर्धनम्।
भक्ताभीष्टप्रदं वंदे स्मर्तृगामी स नोऽवतु॥५॥

शोषणं पापपंकस्य दीपनं ज्ञानतेजसः।
तापप्रशमनं वंदे स्मर्तृगामी स नोऽवतु॥६॥

सर्वरोगप्रशमनं सर्वपीडानिवारणम्।
आपदुद्धरणं वंदे स्मर्तृगामी स नोऽवतु॥७॥

जन्मसंसारबंधघ्नं स्वरुपानंददायकम्।
निःश्रेयसप्रदं वंदे स्मर्तृगामी स नोऽवतु॥८॥

जयलाभयशःकाम-दातुर्दत्तस्य यः स्तवम्।
भोगमोक्षप्रदस्येमं प्रपठेत्स कृती भवेत्॥९॥

इति श्री. प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचितं श्रीदत्तस्तोत्रं संपूर्णम्॥

## ९ : श्रीदत्तस्तुति

यतीरुप दत्तात्रया दंडधारी।
पदीं पादुका शोभती सौख्यकारी॥
दयासिंधु ज्याची पदें दुःखहारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥१॥

पदें पुष्करा लाजवीती जयाचीं।
मुखाच्या प्रभे चंद्र मोहुनि याची॥
घडो वास येथें सदा निर्विकारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥२॥

सुनीटा असती पोटऱ्या गुल्फ जानू।
कटिं मौंज कौपीन ते काय वानूं।
गळां मालिका ब्रह्मसूत्रासि धारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥३॥

गळां वासुकीभूषणे रुंडमाळा।
टिळा कस्तुरी केशरी गंध भाळा॥
जयाची प्रभा कोटिसूर्यासी हारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥४॥

जटाभार माथां प्रभा कुंडलांची।
त्रयास्यें भुजा शास्त्र सायूध साची॥
त्रिशूळ माळादिक छाटिधारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥५॥

कली पातका पातका वाढवाया।
तयाने जनां मोहिले गाढ वायां॥
जगीं अवतरे दुःखहारा असुरारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥६॥

अनूसया सत्त्व हरावयासी।
त्रिमूर्ति जातां करि बाळ त्यांसी॥
निजे पालखीं सर्वदा सौख्यकारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥७॥

प्रसिद्ध असती क्षेत्रतीर्थे तयांचा।
कली पातलया जाहला लोप साचा॥
करी तत्प्रसिद्धी मिषें ब्रह्मचारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥८॥

मुखें वेद नीचाचिया बोलवीले।
श्रिशैल्या क्षणें तंतुकालागिं नेलें॥
सुदेही करी विप्रकुष्टा निवारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥९॥

दरिद्रें बहु कष्टला विप्र त्यासी।
क्षणें द्रव्य देऊनि संतोषवीसी॥
दिला पुत्र वंध्या असुनी वृद्ध नारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥१०॥

मनीं इच्छि विप्रैक व्हाया अन्नदान।
असें जाणुनी कौतुका दावि पूर्ण॥

करी तृप्त लेशान्निं जो वर्ण चारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥११॥

विलोकूनिया शूद्रभक्ती मनीं ती।
कृपें दीधले पीक अत्यंत शेतीं॥
करी काशियात्रा कुमारा अधारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥१२॥

नृपस्थानिं रंकासही स्थापियेलें।
मदें व्यापिले विप्र निर्गर्व केले॥
कृपादृष्टिनें स्फोटकातें निवारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥१३॥

द्विजाच्या घरी घेवडा वेल ज्याने।
मुळापासुनी तोडिला तो तयाने॥
दिली संतती संपदा दुःखहारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥१४॥

शुष्कासुनी काष्ठही वृक्ष केला।
गतप्राण तो पुत्र सजीव केला॥
औदुंबरी आवडे वास भारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥१५॥

त्रिलोकीं अशी कीर्ति केली अगण्य।
अगम्यागमा ख्यातिही ज्याची धन्य॥
स्मरे भक्तिनें तद्भवदुःखहारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥१६॥

अनंतावधी जाहले अवतार।
परी श्रीगुरुदत्त सर्वांत थोर।।
त्वरें कामना कामिकां पूर्णहारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।१७।।

तपें तीर्थ दाने जपादी करीती।
स्वहीतार्थ ते दैवताला स्तवीती।।
परी केलिं कर्मै वृथा होति सारीं।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।१८।।

सदा आससी दत्त सर्वार्थकामा।
त्वरें भेटसी टाकुनी सर्व कामा।।
मना माझिया आवरी दैन्यहारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।१९।।

मनीं आवडी गायनाची प्रभुला।
करी सुस्वरें नित्य जो गायनाला।।
तयाच्या त्वरें संकटातें निवारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।२०।।

असे क्षेत्र काशी शिवाची पुरी ते।
प्रभातीं करी स्नान गंगातिरी तें।।
करी कर्विरी अन्हिं भिक्षार्थ फेरी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।२१।।

निशीं जाय निद्रार्थ मातापुरासी।
सवें कामधेनू वसे तेजरासी।।

तसे श्वानरुपी सर्वे वेद चारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।२२।।

जनां मुक्तिचा मार्ग दावावयासी।
कळाया स्वरूपप्रचीती तयांसी।।
त्रिलोकीं करी जो निमीषार्धिं फेरी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।२३।।

असें रूप ठावें तुझे असतांना।
वृथा हिंडलो दैवतें तीर्थ नाना।।
परी शेवटी पायिं आलो भवारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।२४।।

जधी जन्मलों नेणुं दुःखा सुखाला।
अयुर्दाय अज्ञानिं तो व्यर्थ गेला।।
कळूं लागतां खेळलों खेळ भारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।२५।।

तृतीयांश आयुष्य ऐसेंचि गेले।
परी नाहिं त्वन्नाम मीं आठवीलें।।
अतां यौवन प्राप्त झालें अपारीं।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।२६।।

परद्रव्य कांता पराची पहातां।
स्मरादी रिपू ओढिती मानसाऽतां।।
कसा ध्याउं तूतें मधूकैटभारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी।।२७।।
पुढें वृद्धता प्राप्त होईल वाटे।

तिच्या यातना देखतां चित्त फाटे॥
कधीं भेटसी केविं हो चक्रधारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥२८॥

आयुष्यार्ध निद्रार्णवामाजि गेलें।
पणा तीन शेषांत ते जाण केले॥
तयांनी मना गोविलें दुःखभारीं।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥२९॥

अशा घोर मायासमुद्रा पहातां।
भिवोनी पदीं पातलों तुमच्याऽतां॥
तरी क्लेश चिंतादि दुःखासि हारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥३०॥

त्यजा मत्त पाखंद तें सज्जना हो।
धरा मानसीं भक्ति निष्ठा दृढा हो॥
भवांबूधिच्या नेइ तो पैलतीरीं।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥३१॥

स्वतां घेतला दाखला सद्‌गुरूंचा।
तसा घेति ते आणि घेतील साचा॥
मनःकामना होतसे पूर्ण सारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥३२॥

करी पाठ जो का स्तुती ही त्रिकाळा।
तयाच्या प्रतापें पडे भीति काळा॥
गुरु सर्वदारिद्र्य दुःखा निवारी।
तुम्हांवीण दत्ता मला कोण तारी॥३३॥

# १० : करावी कृपा गुरुनाथा

भवतारक या तुझ्या पादुका वंदिन मी माथां। करावी कृपा गुरुनाथा ।।धृ.।।

बहु अनिवार हे मन माझे चरणीं स्थिर व्हावें। तव भजनीं लागावें ।। कामक्रोधादिक हे षड्रिपु समूळ छेदावे। हेचि मागणें मला द्यावें ।। (चाल)

अघहरणा करिं करुणा दत्ता धांव पाव आतां। करावी कृपा गुरुनाथा ।।१।।

तूंचि ब्रह्मा तूंचि विष्णु तूंचि उमाकांत। तूंचि समग्र दैवत। माता पिता इष्ट बंधू तूंचि गणगोत। तूंचि माझें सकळ तीर्थ ।। (चाल) तुजविण मी गा कांहीच नेणें तूंचि कर्ता हर्ता। करावी कृपा गुरुनाथा ।।२।।

तनमनधन हे सर्व अर्पुनी कुरवंडीन काया। उपेक्षूं नको गुरुराया ।। कर्महीन मी, मतीहीन मी, सकल श्रम वाया। लज्जा राखी गुरु सदया ।। (चाल) मातृबालकापरि सांभाळी तूंचि मुक्तिदाता। करावी कृपा गुरुनाथा ।।३।।

शेषा ब्रह्मया वेदां न कळे महिमा तव थोर। तेथें मीं काय पामर ।। वियोग नसुं दे तव चरणांचा हाचि देई वर शिरीं। या ठेवी अभयकर ।। (चाल) हीच विनंती दर्शन द्यावें दासा रघुनाथा। करावी कृपा गुरुनाथा ।।४।।

# ११ : करुणात्रिपदीतील पहिले पद

शांत होई श्रीगुरुदत्ता। मम चित्ता शमवी आता ॥धृ.॥

तूं केवळ माता जनिता। सर्वथा तूंचि हितकर्ता॥ तू आप्त स्वजन भ्राता। सर्वथा तूंचि रे त्राता। भयकर्ता तूं भयहर्ता। दंडधर्ता तू परिपाता। तुजवांचुनि न दुजी वार्ता। तूं आर्ता आश्रयदाता। शांत हो.॥१॥

अपराधास्तव गुरुनाथा। जरि दंडा धरिसि यथार्था। तरि आम्ही गाऊनि गाथा। तव चरणी नमवू माथा॥ तूं तथापि दंडिसि देवा। कोणाचा मग करुं धावा। सोडविता दुसरा तेव्हां। कोण दत्ता आम्हां त्राता॥ शांत हो. ॥२॥

तूं नटसा होउनि कोपी। दंडिताहि आम्ही पापी। पुनरपिही चुकत तथापि। आम्हांवरि नच संतापी। गच्छतः स्खलनं क्वापी। असें मानुनि नच हो कोपी। निज कृपालेश रे ओपी। आम्हांवरि तूं भगवंता॥ शांत हो. ॥३॥

तव पदरी असता ताता। आडमार्गी पाउल पडतां। सांभाळुनि मार्गावरता। आणिता न दुसरा त्राता। निज बिरुदा आणुनि चित्ता। तूं पतितपावन दत्ता। वळे आतां आम्हांवरता। करुणाघन तूं गुरुनाथा॥ शांत हो. ॥४॥

सहकुटुंब सहपरिवार। दास आम्ही हे घरदार। तव पदी अर्पुं असार। संसाराहित हा भार॥ परिहरिसी करुणासिंधो। तूं दीनानाथ सुबधो। आम्हां अघलेश न बाधो। वासुदेव प्रार्थित दत्ता॥ शांत हो. ॥५॥

# १२ : श्रीगुरुदत्तात्रेयाष्टकम्

तापत्रयानें मम देह तापला। विश्रांति कोणी न च देतसे मला।
दैवें तुझें हे पद लाधलें मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला।।१।।

कामादि षडवैरि सदैव पीडिती। दुर्वासना अंग सदैव ताडिती।
त्राता दुजा कोण न भेटला मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला।।२।।

देही अहंता जडली न मोडवे। गृहात्मजस्त्रीममता न सोडवे।।
त्रित पदावानळ पोळितो मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला।।३।।

अंगी उठे हा अविचार दुर्धर। तो आमुचें हे बुडवीतसे घर।।
पापें करोनि जाळितो त्वरें मला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तूला।।४।।

तूंचि कृपासागर मायबाप तूं। तूं विश्वहेतू हरि पापताप तूं।।
न तूजवांचूनि दयाळु पाहिला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला।।५।।

दारिद्र्यदावें द्विज पोळतां तया। श्री द्यावया तोडिसि वेल चिन्मया।।
तया परि पाही दयार्द्र तूं मला। दत्ता कृपा साउलि ने नमूं तुला।।६।।

प्रेतासि तूं वाचविसी दयाघना। काष्ठासि तूं पल्लव आणिसी मना।
हें आठवी मी तरि जीव कोमला। दत्ता साउलि दे नमूं तुला।।७।।

ह्या अष्टके जे स्तविती तयावरी। कृपा करी हात धरी तया शिरीं।
साष्टांग घालूं प्रणिप्रात बा तुला। दत्ता कृपासाउलि दे नमूं तुला।।८।।

इति श्री. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचितं श्रीगुरुदत्तात्रेयाष्टकं संपूर्णम्।।

# १३ : श्रीगुरुपादुकाष्टक

ज्या संगतीनेंच विराग झाला। मनोदरींचा जडभास गेला।
साक्षात् परात्मा मज भेटवीला। विसरू कसा मी गुरुपादुकांला ।।१।।

सद्योगपंथें घरिं आणियेलें। अंगेंच मातें परब्रह्म केलें।
प्रचंड तो बोधारवी उदेला। विसरू कसा मी गुरुपादुकांला ।।२।।

चराचरी व्यापकता जयाची। अखंड भेटी मजला तयाची।
परं पदीं संगम पूर्ण झाला। विसरू कसा मी गुरुपादुकांला ।।३।।

जो सर्वदा गुप्त जनांत वागे। प्रसंगा भक्तां निजबोध सांगे।
सद्भक्तिभावाकरितां भुकेला। विसरू कसा मी गुरुपादुकांला ।।४।।

अनंत माझे अपराध कोटी। नाणीं मनीं घालुनि सर्व पोटी।
प्रबोध करितां श्रम फार झाला। विसरू कसा मी गुरुपादुकांला ।।५।।

कांही मला सेवनही न झालें। तथापि तेणें मज उद्धरीलें।
आतां तरी अर्पिन प्राण त्याला। विसरुं कसा मी गुरुपादुकांला ।।६।।

माझा अहंभाव वसे शरीरीं। तथापि तो सद्गुरु अंगिकारीं।
नाही मनी अल्पविकार ज्याला। विसरुं कसा मी गुरुपादुकांला ।।७।।

आतां कसा हा उपकार फेडू। हा देह ओवाळुनि दूर सांडूं।
म्यां एकभावे प्रणिपात केला। विसंरु कसा मी गुरुपादुकांला ।।८।।

जया वानितां वानितां वेदवाणी। म्हणे 'नेति नेतीति' लाजे दुरुनी ।।
नव्हे अंत ना पार ज्याच्या रूपाला। विसंरु कसा मी गुरुपादुकांला ।।९।।

जो साधुचा अंकित जीव झाला। त्याचा असे भार निरंजनाला।
नारायणाचा भ्रम दूर केला। विसरू कसा मी गुरुपादुकांला ।।१०।।

## १४ : श्रीगुरुमहिमा

गुरु हा संतकुळींचा राजा। गुरु हा प्राणविसावा माझा।
गुरुविण देव नाही दुजा। पाहतां त्रिलोकीं ।।१।।

गुरु हा सुखाचा सागर। गुरु हा प्रेमाचा आगर।
गुरु हा धैर्याचा डोंगर। कदाकाळी डळमळेना ।।२।।

गुरु हा सत्यालागी साह्य। गुरु हा साधकांसी माय।
गुरु हा कामधेनु गाय। भक्तांघरी दुभतसे ।।३।।

गुरु हा भक्तींचे मंडण। गुरु हा काळासी दंडण।
गुरु हा करितसे खंडण। नानापरी पापांचे ।।४।।

गुरु हा वैराग्याचे मूळ। गुरु हा परब्रह्म केवळ।
गुरु हा दाखवी तात्काळ। गांठी लिंग-देहाचें ।।५।।

गुरु हा घाली ज्ञानांजन। गुरु हा दाखवी निजधन।
गुरु हा सौभाग्य देऊन। स्वात्मबोध नांदवी ।।६।।

काया काशी गुरु उपदेशी। तारकमंत्र दिला आम्हांसी।
बाप विठ्ठल रखुमायेसी। विठ्ठल विनवी गुरुचरणी ।।७।।

## १५ : गुरुप्रदक्षिणा

धन्य धन्य हो प्रदक्षिणा सद्गुरुरायाची।
झाली त्वरा सुरवरां विमान उतरायाची।।ध्रु.।।

पदोपदीं घडल्या अपार पुण्याच्या राशी।
सकलहि तीर्थें घडली आम्हां आदिकरूनि काशी।।१।।

कोटी ब्रह्महत्या हरती करितां दंडवत।
लोटांगण घालितां मोक्ष लोळे पायात।।२।।

मृदंग टाळ घोष भक्त भावार्थे गाती।
नामसंकीर्तनी नित्यानंदें नाचती।।३।।

गुरुभजनाचा महिमा न कळे आगम निगमांसी।
अनुभव ते जाणती जे गुरुपदिंचे अभिलाषी।।४।।

प्रदक्षिणा करुनी देह भावें वाहिला।
श्रीरंगात्मज विठ्ठल पुढे उभा राहिला।।५।।

## १६ : श्रीदत्त–प्रार्थना–स्तोत्र

तव चरणांना शरण असति त्यां, मरण नसे दत्ता!
नित्य ठेविसी अच्युत-धामी, अनन्य निज भक्ता।।धृ.।।
अगतिक झाले भवतापाने।
त्रस्त जाहले निज दुरितानें।
गांजुनि गेले परिस्थितीनें।
आश्रय देउनि धन्य करिसिं त्यां, दिव्य तुझी सत्ता।।१।।

देवांनाही दुलर्भ जें पद।
दत्ता तव हे पवित्र सत्पद।
दर्शनमात्रें हो आनंद।
याहुनि दुसरे सौख्य नसे मम, चरणलीन चित्ता॥२॥
वाट दाविसी चुकलेल्यांना।
तारुनि नेसी तूं आर्तांना।
सेवा करितां हरिसि यातना।
हरि हर ब्रह्मा बालरूप तव, अनसूया माता॥३॥
युगायुगांतून तूंच चिरंतन।
चैतन्याचे पुनरावर्तन।
संसाराचे तोडिसि बंधन।
जप तप ध्यानें तुला वाहिली, उद्धरि मज आतां॥४॥
करुणेचे हो तुम्हीच सागर।
तपोबलाचे गौरीशंकर।
सत्त्वगुणाचे निधी खरोखर।
त्रिगुणात्मक! षड्विभवयुता! मज सांभाळी दत्ता॥५॥
दिवाकराला प्रकाश देउन।
मोक्षाचा सुख-मार्गहि दावुन।
वरती आतां घेई उचलुन।
पुनश्च आतां नकोच येणें, जन्ममरण-पंथा॥६॥

## १७ : श्रीरंगावधूतस्वामी विरचित दत्तबावनी

या गुजराती दत्तबावनीचा पाठ शेकडो दत्तभक्त नेहमी करीत असतात. श्रीगुरुचरित्राचे सार असलेले हे स्तोत्र आहे. दत्तभक्तांकरिता हे गुजराती स्तोत्र देवनागरीत दिले आहे.

१. जय योगीश्वर दत्तदयाळ। तुंज एक जगमां प्रतिपाळ॥
२. अत्र्यनसूया करी निमित्त। प्रगट्यो जगकारण निश्चित॥
३. ब्रह्माहरिहरनो अवतार। शरणागतनो तारणहार॥
४. अंतर्यामी सत् चित् सुख। बहार सद्गुरु द्विभुज सुमुख॥
५. झोळी अन्नपूर्णा कर मांह्य। शान्ति कमण्डल कर सोहाय॥
६. क्यांय चतुर्भुज षड्भुज सार। अनंतबाहु तुं निर्धार॥
७. आव्यो शरणे बाळ अजाण। ऊठ दिगंबर, चाल्या प्राण॥
८. सुणी अर्जुन केरो साद। रीझ्यो पूर्वे तुं साक्षात्॥
९. दीधी ऋद्धि सिद्धि अपार। अंते मुक्ति महापद सार॥
१०. कीधो आजे केम विलंब। तुजविण मुजने ना आलंब॥
११. विष्णुशर्म द्विज तार्‍यो एम्। जम्यो श्राद्धमां देखी प्रेम॥
१२. जंभदैत्यथी त्रास्या देव  कीधी म्हेर तें त्यां ततखेव॥
१३. विस्तारी माया दितिसुत। इन्द्रकरे हणाव्यो तूर्त॥
१४. एवी लीला कंई कंई शर्व। कीधी वर्णवे को ते सर्व॥
१५. दोड्यो आयु सुतने काम। कीधी अेने तें निष्काम॥
१६. बोध्या यदुने परशुराम। साध्यदेव प्रल्हाद अकाम॥
१७. एवी तारी कृपा अगाध। केम सूणे ना मारो साद॥
१८. दोड अंत ना देख अनंत। मा कर अधवच शिशनो अंत॥
१९. जोई द्विजस्त्री केरो स्नेह। थयो पुत्र तुं निःसंदेह॥
२०. स्मर्तृगामी कलितार कृपाळ। तार्‍यो धोबी छेद गमार॥
२१. पेटपीडथी तार्‍यो विप्र। ब्राह्मणशेठ उगार्‍यो क्षिप्र॥

२२. करे केम ना मारी व्हार। जो आणिगम एकज वार॥
२३. शुष्क काष्ठने आण्यां पत्र। थयो केम उदासीन अत्र ?॥
२४. जर्जर वंध्या केरां स्वप्न। कर्यां सफळ ते सुतनां कृत्स्न॥
२५. करी दूर ब्राह्मणनो कोढ। कीधा पूरण एना कोड॥
२६. वंध्या भेंस दूझवी देव। हर्युं दारिद्रय तें ततखेव॥
२७. झालर खाई रीझ्यो एम्। दीधो सुवर्णघट सप्रेम॥
२८. ब्राह्मणस्त्रीनो मृत भरथार। कीधो सजीवन तें निर्धार॥
२९. पिशाच पीडा कीधी दूर। विप्रपुत्र उठाड्यो शूर॥
३०.हरी विप्रमद अंत्यजहाथ। रक्ष्यो भक्त त्रिविक्रम तात॥
३१. निमेषमात्रे तंतुक एक। प्होंचाड्यो श्रीशैले देख॥
३२. एकी साथे आठ स्वरूप। धरी देव बहुरूप, अरुप॥
३३. संतोष्या निजभक्त सुजात। आपी परचाओ साक्षात्॥
३४. यवनराजनी टाळी पीड। जातपातनी तने न चीड॥
३५. रामकृष्णरूपे तें एम। कीधी लीलाओ कई तेम॥
३६. तार्यां पथ्थर गणिका व्याध। पशुपंखी पण तुजने साध॥
३७. अधमओधारण तारूं नाम। गातां सरे न शां शां काम॥
३८. आधि व्याधि उपाधि सर्व। टळे स्मरणमात्रथी शर्व॥
३९. मूढचोट ना लागे जाण। पामे नर स्मरणे निर्वाण॥
४०. डाकण शाकण भेंसासुर। भूत पिशाचो जंद असुर॥
४१. नासे मुठी दइने तूर्त। दत्तधून सांभळतां मूर्त॥
४२. करी धूप गाअे जे एम्। दत्तबावनी आ सप्रेम॥
४३. सुधरे तेना बन्ने लोक। रहे न तेने क्यांये शोक॥
४४. दासी सिद्धि तेनी थाय। दुःख दारिद्रय तेनां जाय॥
४५. बावन गुरवारे नितनेम। करे पाठ बावन सप्रेम॥
४६. यथावकाशे नित्यनियम। तेने कदी न दंडे यम॥

४७. अनेक रूपे एज अभंग। भजतां नंडे न माया-रंग॥
४८. सहस्त्र नामे नामी एक। दत्त दिगंबर असंग छेक॥
४९. वंदु तुजने वारंवार। वेदश्वास तारा निर्धार॥
५०. थाके वर्णवतां ज्यां शेष। कोर रांक हुं बहुकृत वेश॥
५१. अनुभव तृप्तिनो उद्गार। सूणी हसे ते खाशे मार॥
५२. तपसी तत्त्वमसि ए देव। बोलो जय जय श्रीगुरुदेव॥

॥ बोलो जय जय श्रीगुरुदेव॥

## १८ : श्रीदत्तमानस पूजा

श्रीदत्ता! सद्गुरो! दत्ता! कृपेचे तुम्हि सागर।
तुमचे रूप हें राहो मम ध्यानी निरन्तर॥१॥

दत्तात्रेय तुम्ही ब्रह्मा विष्णु शंकर शक्तिही ।
वास्तव्य करूनी केली सौभाग्यें धन्य ही मही॥२॥

ध्यानमूर्ती सदा राहो षड्भुजा! मम सन्मुख।
गोमाता, श्वान ते चारी वेद-दर्शन दे सुख॥३॥

ठेवितो चरणी माथा हस्त जोडुनि वंदितों।
शरणागत मी तुम्हां अनन्यगति बोलतों॥४॥

प्रार्थना करितों यावे हृदयासन मांडिले।
बैसावें यावरी आतां वंदितों तव पाउले॥५॥

स्मर्तृगामी अशी कीर्ती तिन्ही लोकांत जाहली।
म्हणुनी दर्शनासाठी स्मृती केलीच आपुली॥६॥

पूजेची सर्व सामग्री शुद्ध सोज्वळ साजिरी।
गुरुमूर्तीस अर्पाया आणिली मी परोपरी॥७॥

भोवती पसरे आभा सूर्य कीं ग्रहमंडळी।
शोभती सिद्धी शक्तीही तारका नभ-मंडळी॥८॥

निगुर्णाकारही साक्षात् रूप घेऊनि साजिरें।
करी स्वीकार पूजेचा कृपाळू सेवकां खरे॥९॥

चरणां स्नान घालाया शुद्ध मन्मन होय तें।
आणिलें पाद्यपूजेतें सुगंधी जल उष्ण तें॥१०॥

अभिषेक असो आतां प्रेमाश्रू धार वाहते।
शरणागत मी आलों आतां आपण रक्षिते॥११॥

सेवा-तत्परता हेंच जल पात्रात ठेविलें।
हस्तप्रक्षालनासाठी आतां हे अर्घ्य अर्पिले॥१२॥

मनीच्या शुद्ध भावाने जलरुपच घेतलें।
करा आचमना आतां पाणी हातावरी दिलें॥१३॥

शब्दादि विषयानीही जणूं द्रव्यत्व घेतलें।
इंद्रियें सर्व एकत्र, पंचामृत हि जाहले॥१४॥

सुगंधी तैलही देतों मन सद्भाव-गंधित।
स्नान उष्णोदके दत्ता करावें आजि स्वीकृत॥१५॥

अभिषेकार्थ ही गंगा चित्त-पात्रांत आणिली।
स्वीकारा भावभक्तीची धारा संतत वाहिली॥१६॥

भक्तीच्या नव धाग्यांचे विणलें अति-कोमल।
वस्त्र हे नेसण्यासाठी अर्पितों शुभ्र निर्मल॥१८॥

दत्त-सेवक-संबंधे जानवे जपसाधन।
उत्तरीय अतां घ्यावें नम्र आत्मनिवेदन॥१८॥

अष्ट सात्त्विक भावांचे अष्टगंधहि चंदन।
मलयागुरु सेवेचा सिंदुरें धर्म अर्पण॥१९॥

वृत्तींची वाहिली पत्री बिल्व हा त्रिगुणात्मक।
दूर्वा मनांतल्या उर्मी, तुलसी प्राण सात्त्विक॥२०॥

कर्मांचा पुष्प-संभार, हार अर्पण मी करी।
धूप सत्कार्यरूपी हा दुरितें सारू दे दुरी।२१॥

नीरांजन मनाचे हे भक्तीची ज्योत लावली।
आरती दत्तभावाने दत्ता ओवाळितों खरी॥२२॥

नैवेद्य जीवनाचा हा दाविला भोजनास्तव।
मीपणा चरणी लीन, दक्षिणा रुप हा स्तव॥२३॥

पंचपक्वान्नरुपाने पंचप्राणहि अर्पिले।
पंचतत्त्वे फळे झाली शांतीचे दुग्ध अर्पिलें॥२४॥

हस्तप्रक्षालनासाठी तपाचरण हें जल।
भक्तीरंगांत रंगोनी अर्पिला दिव्य तांबुल॥२५॥

पूजा संपूर्ण ही होतां शब्दांचे मंत्रपुष्पही।
अपार महिमा आहे, प्रतापा अपुरी मही॥२६॥

सर्वत्र गुरुतत्त्वातें पाहे कवि दिवाकर।
प्रसन्न सर्वदा राहो दत्तात्रेय दिगंबर॥२७॥

## १९ : श्रीदत्तात्रेयप्रातःस्मरणस्तोत्रम्

प्रातः स्मरामि करुणावरुणालयं तं।
श्रीदत्तमार्तवरदं वरदण्डहस्तम्॥
दमनं विनीत-स्वान्त-र्गताखिलमलं विमलं प्रशातम्॥१॥

प्रातर्भजामि भजदिष्टवरप्रदं तम्॥
दत्तं प्रसादसदनं वरहीरदंतम्।
कान्तं मुद्रात्रितनयं भवमोक्षहेतुम्।
सेतु वृषस्य परमं जगदादिहेतुम्॥२॥

प्रातर्नमामि प्रयतोऽनसूयाः।
पुत्रं स्वमित्रं यमितोऽनसूयाः॥
भूयांस आप्तास्तमिहार्तबन्धुं।
कारुण्यसिन्धु प्रणमामि भक्त्या॥३॥

लोकत्रयगुरोर्यस्तु श्लोकत्रयमिदं पठेत्।
श्रीदत्तात्रेयदेवस्य तस्य संसारभीः कुतः॥४॥

इति श्री प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वतीविरचितं
श्रीदत्तात्रेयप्रातःस्मरणस्तोत्रं संपूर्णम्॥

## २० : प्राकृत श्रीदत्तात्रेय स्तोत्र

जटाधारी पांडुरंगा। शूलधारी कृपानिधे।
सर्व रोग हरी देवा। अत्रिसूता तुला नमो॥१॥

विश्वनिर्माण कर्ता तूं। स्थितिसंहार कारक।
भवपाश विमुक्ताला। अत्रिसूता तुला नमो॥२॥

जराजन्म विनाशी तूं। देहशुद्धि करा तुला।
दिगंबरा दयामूर्ते। अत्रिसूता तुला नमो ॥३॥

कर्पूरसम देहाच्या। ब्रह्ममूर्ति धरी तुला।
वेद शास्त्र परिज्ञात्या। अत्रिसूता तुला नमो ॥४॥

लघु थोर कृशा स्थूला। नामगोत्र विहीन तूं।
पंचभूतैक दीप्ताला। अत्रिसूता तुला नमो ॥५॥

यज्ञभोक्त्या यज्ञरूपा। यज्ञरूप धरा तुला।
यज्ञप्रिया सिद्ध पुरुषा। दत्तात्रेया तुला नमो ॥६॥

आधी ब्रह्मा मधें विष्णु। अंती देव सदाशिव।
त्रैमूर्ति स्वरूपाला। अत्रिसूता तुला नमो ॥७॥

भोगरूपी भोकभोक्त्या। सुयोग्या योगधारका।
जितेंद्रिया जितज्ञाला। दत्तात्रेया तुला नमो ॥८॥

दिगंबरा दिव्यरूपा। अवधूता निरंजना।
सदोदित ब्रह्मरूपा। दत्तात्रेया तुला नमो ॥९॥

जंबुद्विपी महाक्षेत्री। मातापूर निवासि तूं।
जपमाना महादेवा। दत्तात्रेया नमो नमो ॥१०॥

भिक्षाटन घरीं ग्रामीं। सोनपात्रीं करीशि तूं।
नानास्वादयुता भिक्षा। दत्तात्रेया तुला नमो ॥११॥

ब्रह्मज्ञानी तुझी मुद्रा। वस्त्र आकाश भूतल।
प्रज्ञानधन बोधा तू। दत्तात्रेया तुला नमो ॥१२॥

अवधूता सदानंदा। पूर्ण ब्रह्मस्वरूप तूं।
विदेह देहरूपाला। दत्तात्रेया तुला नमो ॥१३॥

सत्यरूप सदाचारी। सत्यधर्मी परायणा।
सत्याश्रेय परोक्षाला। दत्तात्रेया तुला नमो।।१४।।

हातीं शूल गदा घेशी। वनमाला सुकंधरा।
यज्ञप्रभो ब्रह्मरूपा। अत्रिसूता तुला नमो।।१५।।

क्षराक्षर स्वरूपाच्या। परात्परतरा तुला।
दत्तमुक्तिपर स्तोत्रा। अत्रिसूता तुला नमो।।१६।।

लक्ष्मीशा दत्ताविद्याढ्या। स्वात्मरूपा प्रभो तुला।
गुणनिर्गुणरूपा हे। दत्तात्रेया नमो नमो।।१७।।

शत्रुनाशकर स्तोत्र। ज्ञानविज्ञान दायक।
सर्व पापें लया जाती। स्तोत्राच्या पठणें तुझ्या।।१८।।

ऐसें स्तोत्र महादिव्य। दत्तदर्शनदायक।
श्रीदत्ताच्या प्रसादाने। नारदानें निवेदिलें।।१९।।

स्तोत्रराज महादिव्य। प्राकृती रचिले असे।
श्रीगुरुच्या प्रसादानें। होईल फलदायक।।२०।।

## २१ : पुष्पांजली

पुष्पांजली अर्पितसे तुज दयाघना।
रिपुदमना भयशमना दुरतिनाशना।।धृ.।।

यज्ञेश्वर यज्ञपती याज्य श्रीपती।
देवादिक साह्य तुझे नित्य वांछिती।।

गौरविती सकलहि तुज शास्त्र आणि श्रुति।
सकला तू सुखदायक सुखवि लोचना।।१।।

भोक्ता तू सम्राट तू जगद्व्यापका।
स्वानंदी रमत सदा विरतिनायका।।
रांज्य तूचि राजसि बा विश्वपालका।
तू ब्रह्मा शिव विष्णू निखिल-वंदना।।२।।

ध्याता तू ध्येयचि तू ध्यान तू असे।
ज्ञाता तू ज्ञेय तूचि ज्ञानही तसे।।
कर्ता तू करविसि तव पूर्ण कृति दिसे।
किंचिदपि त्वद्विण जगि नान्य पावना।।३।।

सच्चित्सुख पूर्ण परात्पर ब्रह्म तू।
मायापति मायाहर ज्ञानदीप तू।।
विविधत्वे आराध्या! जगति एक तू।
तू धर्ता तू हर्ता पतितपावना।।४।।

श्रीशा तव मूर्ति असो हृदयमंदिरी।
धरूनि भाव अर्पितसे तुलसिमंजिरी।।
रति मम तव चरणि असो ठेवि कर शिरी।
अघशमना मनरमणा भव विमोचना।।५।।